**विभागीय आयुक्त, कोकण यांच्या अध्यक्षतेखाली चौकशी समितीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांकः विपआ- २०२२/प्र.क्र.२०/ अ-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: २३ फेब्रुवारी, २०२२

<u>प्रस्तावना -</u>

महाराष्ट्र विधानमंडळाच्या सन २०२१ च्या तीसरे (हिवाळी) अधिवेशनात श्री.रविंद्र फाटक, विधानपरिषद सदस्य यांनी "पुणे-बडोदा महामार्गाकरीता टिटवाळा (जि.ठाणे) परिसरातील बाधित होणाऱ्या चाळकऱ्यांना मोबदला देण्याबाबत" या विषयाचा तारांकित प्रश्न क्र.१०७९८ च्या चर्चे दरम्यान प्रस्तुत प्रकरणी चौकशी करण्याचे मा.मंत्री (महसूल) यांनी सभागृहाला आश्वासित केले आहे. वरील वस्तुस्थितीच्या अनुषंगाने चौकशी समिती स्थापित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :-**

"पुणे-बडोदा महामार्गाकरीता टिटवाळा (जि.ठाणे) परिसरातील बाधित होणाऱ्या चाळकऱ्यांना मोबदला देण्याप्रकरणी" विभागीय आयुक्त, कोकण यांच्या अध्यक्षतेखाली या आदेशान्वये खालीलप्रमाणे तीन सदस्यीय चौकशी समिती गठित करण्यात येत आहे.

१. विभागीय आयुक्त, कोकण विभाग - अध्यक्ष
२. उपायुक्त, (भूसंपादन) विभागीय आयुक्त कोकण विभाग- सदस्य सचिव
३. तालुका निरिक्षक, भूमी अभिलेख- सदस्य

०२. चौकशी समितीची कार्यकक्षा.

(i) विषयांकीत प्रकल्पात टिटवाळा परिसरात भुसंपादनाशी निगडीत महसूल यंत्रणेतील प्रशासकीय अधिकारी तसेच त्यांचे नातेवाईक यांनी भुसंपादनाचा मोबदला मिळावा या हेतूने भुसंपादन प्रक्रीयेच्या कालावधीत जमीनी विकत घेतल्या आहेत किंवा कसे ?

(ii) प्रस्तुत प्रकरणी अनाधिकृत चाळी भुसंपादन प्रक्रिया पुर्वी पासुन अस्तित्वात होत्या का? अनाधिकृत चाळ धारकाना मोबदला देय ठरतो का ?

(iii) चाळ यूक्त भुखंडावर जमीन मालकास मोबदला देतांना चाळी रिकाम्या करून जमीनीचा ताबा संबंधीत यंत्रणेस देण्याची खबरदारी घेण्यात आली नसल्या प्रकरणी कोण जबाबदार आहे ?

(iv) प्रस्तुत विषयी चौकशी ३० दिवसात पुर्ण करून अहवाल शासनास सादर करावा.

०३. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२२०२२३१४५५५१७८१९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by SANJAY SHANKARRAO INGLE
Date: 2022.02.23 14:58:56 +05'30'

**( संजय इंगळे )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री, यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री (महसूल), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.राज्यमंत्री (महसूल), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मामुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
७) प्रधान सचिव (वने), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८) विभागीय आयुक्त,कोकण विभाग
९) निवड नस्ती (कार्यासन अ-४).